"प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) स्थापना करण्याबाबत"

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईव्हीएम-२०२३/प्र.क्र. ५०१/२३/३३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १७ जुलै, २०२३

**प्रस्तावना :-**

भारत निवडणूक आयोगाच्या नियंत्रणाखाली महाराष्ट्र राज्यामध्ये लोकसभा/राज्यसभा सार्वत्रिक निवडणूका EVM मशिन्सच्या सहाय्याने पार पाडण्याची जबाबदारी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्यावर सोपविण्यात आली आहे. आगामी लोकसभा सार्वत्रिक निवडणुका-२०२४ सुरळीत पार पाडण्याच्या दृष्टीने राज्यात असलेल्या एकूण मतदान केंद्रांतील सर्व संवेदनशील अथवा एकूण मतदान केंद्रांच्या किमान ५० टक्के यापैकी जे अधिक असेल त्या केंद्रांवर वेबकास्टींग करण्याबाबतच्या सूचना भारत निवडणूक आयोगाने दि. १९ जून,२०२३ रोजीच्या पत्रान्वये राज्यांना दिल्या आहेत. त्यानुसार आगामी काळात होणा-या लोकसभा सार्वत्रिक निवडणुका, २०२४ साठी राज्यातील सर्व मतदान केंद्रावर वेब कास्टींग करण्याकरीता टेंडर प्रक्रिया राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

भारत निवडणूक आयोग, मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालय व महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी कार्यालय यांच्यात समन्वय राखण्याच्या दृष्टीने एकच सर्वसमावेशक अशा अभिकर्त्याची निवड केल्यास ते अधिक संयुक्तिक होणार आहे. याबाबत राज्यस्तरावर संगणकीय समन्वय राखणे, त्याबाबत येणा-या अडीअडचणींचे सोडवणूक करणे हे काम पूर्णत: तज्ञ स्वरुपाचे आहे. त्यामुळे निविदा सूचना तयार करण्यापासून ते निविदांची छाननी करुन व्यावहारिक दृष्टीने सक्षम अभिकर्त्यांची निवड करणे, या बाबींसाठी तज्ञ सल्लागाराची नेमणूक करणे आवश्यक आहे. प्रस्तुत सल्लागार माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दि. ९.५.२०१९ अन्वये व दि. २४ एप्रिल,२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि. १९ सप्टेंबर,२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या शासन निर्णयान्वये शासनाचे विविध विभागांच्या e-Governance ( IT Project ) उपक्रमाला सल्लाविषयक सेवा देण्यासाठी निवड करण्यात आलेल्या १) M/s. Accenture, २) M/s. Deloitte, ३) M/s. Ernst & young, ४) M/s. KPMG,५) M/s. PWC, ६) M/s. Wipro या कंपन्यांची निवड केली आहे. त्यामुळे ई-निविदा प्रकियेचा अवलंब करतांना उपरोक्त संस्थांपैकी एका संस्थेची निवड करावी किंवा अन्य खाजगी सल्लागाराची निवड करावी, यासाठी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दि. २१.९.२०१२ अन्वये विभागाची प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार सहा तज्ञ सल्लागार कंपन्यांपैकी एका कंपनीमधून एका सल्लागाराची निवड करावी किंवा अन्य खाजगी सल्लागाराची निवड करावी,यासाठी पुढीलप्रमाणे अंमलबजावणी समितीची स्थापना करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी | - अध्यक्ष |
| सचिव/प्रधान सचिव/अमुस, नियोजन विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अमुस, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अमुस, उद्योग विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| संचालक, माहिती तंत्रज्ञान यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी | - सदस्य |

सदर समितीने मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना अपेक्षित असलेल्या कामाचा आढावा घेवून ई-निविदा प्रक्रिया उपरोक्त नमूद सहा कंपन्यांपैकी एका कंपनीमार्फत करावी किंवा अन्य खाजगी सल्लागारामार्फत (त्यांच्या सादरीकरण व तांत्रिक क्षमता यांचा विचार) करुन करावी, याबाबत शिफारस करावयाची आहे. या समितीने एक महिन्याच्या आत ही कार्यवाही पूर्ण करणे अपेक्षित आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०७१८११३२४९८९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ABASAHEB
ATMARAM
KAWALE

Digitally signed by ABASAHEB ATMARAM KAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=dda6dce16e02931d0bcf354ed2558cab3130bb640d7b4ac92d50c0033f733019, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6F74D9AF2E69AEA2F53DF24447EC816F3D101C430D5DA18001F48C333A60BBB, cn=ABASAHEB ATMARAM KAWALE
Date: 2023.07.18 11:34:48 +05'30'

**( आ. आ. कवळे )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. सचिव/प्रधान सचिव/अमुस, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव/प्रधान सचिव/अमुस, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
३. सचिव/प्रधान सचिव/अमुस, उद्योग विभाग मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक.
६. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक.
७. निवडनस्ती.